**निरीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (गट-ब) यांना पदोन्नतीनंतर महसूली विभाग संवर्ग बदलून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- इएसटी-१२१६/प्र.क्र.१५१/राउशु-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २१ जानेवारी, २०१७.

वाचा:

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र. इएसटी-२७११/प्र.क्र.३१३/इएक्ससी-४ (२५), दि. ७.०२.२०१३.
२) शासन निर्णय, गृह विभाग क्र. इएसटी-२७११/प्र.क्र.३१३/इएक्ससी-४ (३६), दि. ७.०२.२०१३.
३) शासन निर्णय, गृह विभाग क्र. इएसटी-२७११/प्र.क्र.३१३/इएक्ससी-४ (५१), दि. ७.०२.२०१३.
४) शासन आदेश ,गहविभाग क्र.इएसटी-१२१३/प्र.क्र.४ (भाग-१)/राउशु-१(३९),दि. ६.४.२०१५.
५) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या.१२, दि. २८.०४.२०१५
६) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या.१२, दि. १६.०७.२०१५
७) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांचे पत्र क्र.इएसटी १२१६/२१/२-अ-१, दि.१४.०६.२०१६.

**शासन निर्णय**:

संदर्भाधीन (१) ते (४) येथील दि.७.०२.२०१३ व दि.६.०४.२०१५ च्या शासन निर्णयान्वये खालील ४ अधिकाऱ्यांना निरीक्षक (गट-ब), राज्य उत्पादन शुल्क या संवर्गात पदोन्नती देताना तत्कालीन नियमांतील तरतूदींनुसार त्या-त्या महसूली विभागीय संवर्गाचे वाटप करण्यात आले असून या विभागामध्ये ते एका वर्षापेक्षा अधिक काळ कार्यरत आहेत. तथापि, त्यांना उद्भवलेल्या वैयक्तीक/कौटूबिक अडचणींमुळे या महसूली विभागामध्ये बदल करण्याची विनंती या अधिकाऱ्यांनी केली आहे. संदर्भाधीन दि.२८.०४.२०१५ च्या अधिसूचनेन्वये प्रसिद्ध करण्यात आलेल्या “महाराष्ट्र प्रशासकीय गट अ व गट ब (राजपत्रित व अराजपत्रित) मधील सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम, २०१५” च्या कलम १२(अ) मधील नमूद कारणांसाठी कलम १३ मधील अधिकारांचा वापर करुन या अधिकाऱ्यांना पुढीलप्रमाणे महसूली विभाग बदलून देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | वाटप झालेला महसूली विभाग | विनंती करुन मागितलेला महसूली विभाग व त्याबाबतची कारणमिमांसा | बदलून देण्यात येणारा महसूली विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री. बी. ए. जावळीकर, निरीक्षक, राउशु | नाशिक | स्वत: किडनी विकाराने आजारी असून डायलिसिसवर आहेत. सातारा येथे उपचार सुरु असल्यामुळे नाशिक ऐवजी पुणे महसूली विभागाचे वाटप करण्याची विनंती केली आहे. | पुणे |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २ | श्री. डी. पी. बगाव, निरीक्षक, राउशु | नागपूर | आईला हृदयविकार असून बायपास सर्जरी करण्याची आवश्यकता आहे. नाशिक येथे उपचार सुरु असल्यामुळे नागपूर ऐवजी नाशिक महसूली विभागाचे वाटप करण्याची विनंती केली आहे. | नाशिक |
| ३ | श्री. पी. बी. सास्तुरकर, निरीक्षक, राउशु | पुणे | वडिलांना मेंदूचा विकार असून पुणे येथे शस्त्रक्रिया करण्यात आली आहे. पुढील उपचार मुंबई येथे करावयाचे असल्याने कोकण विभागाचे वाटप करण्याची विनंती केली आहे. | कोकण |
| ४ | श्री. एस. वाय. श्रीवास्तव | अमरावती | पत्नीवर हृदयशस्त्रक्रिया झाली आहे. | नाशिक |

२. संदर्भाधीन दि.२८.०४.२०१५ च्या अधिसूचनेन्वये प्रसिद्ध करण्यात आलेल्या "महाराष्ट्र प्रशासकीय गट अ व गट ब (राजपत्रित व अराजपत्रित) मधील सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम, २०१५" च्या कलम १३ मधील अधिकारांचा वापर करुन उपरोक्त अधिकाऱ्यांना निरीक्षक, राउशु या संवर्गात पदोन्नती देताना वाटप करण्यात आलेल्या महसूली विभागाऐवजी त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ (५) च्या रकान्यामध्ये नमूद केलेल्या महसूली विभाग बदलून देण्यात येत आहे. बदलून दिलेल्या महसूली विभागात त्यांच्या पदस्थापनेचे पुढील आदेश निर्गमित होईपर्यंत त्यांनी सध्याच्या पदावर कार्यरत रहावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०१२१११३९२०७१२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip J Shedmekhe

Digitally signed by Dilip J Shedmekhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5c22eb48b36977859e2ada92f034598cc0bc8511f0527da968636a6b9d9e10f0, serialNumber=5603a72ffdb1ef7b928b7c0a641bd1c8ef4b36aa6a8fd21a86271888a24f9803, cn=Dilip J Shedmekhe
Date: 2017.01.21 11:41:24 +05'30'

**(दि.ज.शेडमेखे)**
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रती,**

१) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क, कोकण/पुणे/नाशिक/नागपूर.
३) अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, पुणे/चंद्रपूर/अहमदनगर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/चंद्रपूर/अहमदनगर.
५) संबंधित अधिकारी (मार्फत आयुक्त, राउशु)
६) निवडनस्ती (राउशु-१)